राष्ट्रीय आयुष अभियानांतर्गत सामाजिक विशेष घटकाकरीता मागील प्रलंबित केंद्र व राज्य हिश्श्याचा निधी सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून वितरित करणेबाबत..

**"लेखाशिर्ष - (२२१० जी५८३).."**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः बियुडी-१३२१/प्र.क्र.१६/आरोग्य-७

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : ३१ मार्च, २०२२.

**वाचा :-**

(१) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई पत्र क्रमांक : राआसोम/एफएमजी/आयुष (SCSP) प्रलंबित/१५२०१/२०२१-२२, दिनांक :१०.०५.२०२१.

(२) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्रमांक : राआसोम/आयुष-प्रलंबित निधी/१२४९०१/२०२१-२२, दिनांक :०८.०३.२०२२.

(३) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक : आयुष-३०१९/प्र.क्र. २४९/आरोग्य-७, दिनांक : ११.१०.२०१७.

(४) आयुष मंत्रालश्य, राष्ट्रीय आयुष अभियान, केंद्र शासन, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक : F. No. S-१६०१२/३/२०२१-NAM, dated : ११.०३.२०२२.

(५) सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२१/प्र.क्र.९६/अर्थसंकल्प (विघयो), दिनांक ३१.०३.२०२२.

**प्रस्तावना :-**

संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी संदर्भाधीन पत्र क्रमांक (१) राष्ट्रीय आयुष अभियानांतर्गत सामाजिक विशेष घटकाकरीता सन २०२१-२२ च्या आर्थिक वर्षातील तरतूदीतून "२२१० जी५८३" या लेखाशिर्षाखाली राज्य हिस्सा रुपये ३९.३८ लक्ष (४०%) इतके अनुदान वितरीत करण्यास विनंती केली होती. तसेच, आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी संदर्भाधीन पत्र क्रमांक (२) अन्वये केन्द्र शासनाने राष्ट्रीय आयुष अभियान ही केंद्र पुरस्कृत योजना सप्टेंबर, २०१४ मध्ये सुरु करण्यात आली असून, सदर योजनेनुसार देशातील सामान्य जनतेकरीता आयुष आरोग्य सेवा व शिक्षण उपलब्ध करणे, आयुर्वेदिक, होमिओपॅथिक व युनानी औषधांचा दर्जात वाढ करणे व सातत्यपूर्ण गुणात्मक औषधी वनस्पती पुरवठा करणे इ. घटकांचा समावेश करण्यात आला असल्याचे कळविले आहे. त्याकरीता आवश्यक निधीचे संपूर्ण वितरण करणे गरजेचे असल्याचे कळविले आहे.

दरम्यान, राष्ट्रीय आयुष अभियानांतर्गत सामाजिक विशेष घटकाकरीता सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी ७५% केंद्र हिश्श्यापोटी रक्कम रुपये १८.८५ लक्ष व त्यास समरुप राज्य हिश्श्यापोटी २५% रक्कम रुपये ६.२८ लक्ष इतके अनुदान मंजूर करण्यात आले होते. त्यापैकी संदर्भाधीन क्रमांक (३) च्या शासन निर्णयान्वये अन्वये केन्द्र हिस्सा प्राप्त झाला असून, राज्य हिस्सा प्रलंबित असल्याने, सदरचे प्रलंबित अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

राष्ट्रीय आयुष अभियानांतर्गत सामाजिक विशेष घटकाकरीता सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी ७५% केंद्र हिश्श्यापोटी रक्कम रुपये १८.८५ लक्ष व त्यास समरुप राज्य हिश्श्यापोटी २५% रक्कम रुपये ६.२८ लक्ष इतके अनुदान मंजूर करण्यात आले. तसेच, सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी ६०% केंद्र हिश्श्यापोटी रक्कम रुपये ६५५.२६ लक्ष व त्यास समरुप राज्य हिश्श्यापोटी ४०% रक्कम रुपये ४३६.८४ लक्ष इतके अनुदान मंजूर करण्यात आले. त्यापैकी मूळ अर्थसंकल्पीय तरतूद व पूरक मागणीद्वारे केंद्र हिश्श्यापोटी रुपये ६५५.२६ लक्ष, तसेच राज्य हिश्श्यापोटी रुपये ४३६.८४ लक्ष इतक्या रकमेचे वितरण करण्याचा शासनस्तरावर निर्णय घेण्यात आला.

तथापि, वित्त विभागाच्या ५०% च्या मर्यादेमुळे मार्च अखेर केंद्र हिश्श्यापोटी रुपये ३२७.६३ लक्ष व राज्य हिश्श्यापोटी रुपये २१८.४२ लक्ष इतके अनुदान प्राप्त झाल्याने, सन २०२०-२१ मध्ये केंद्र हिश्श्यापोटी रुपये १२८१.२९ लक्ष रकमेची मूळ अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली. तसेच राज्य हिश्श्यापोटी रुपये १८५.३२ लक्ष रकमेची मूळ व पूरक मागणीन्वये रुपये ३९.३८ लक्ष अशी एकूण रुपये २२४.७० लक्ष इतक्या रकमेची सुधारीत तरतूद करण्यात आली. त्यापैकी मागील प्रलंबित केंद्र हिश्श्यापोटी रुपये ३२७.६३ लक्ष व राज्य हिश्श्यापोटी रुपये १८५.३२ लक्ष इतके अनुदान मार्च अखेर प्राप्त झाले असून त्याबाबतचा तपशील पुढील प्रमाणे आहे :-

(रुपये लाखात)

| वर्ष | मंजूर केंद्र हिस्सा | प्राप्त केन्द्र हिस्सा | शिल्लक केंद्र हिस्सा (२-३) | समरुप राज्य हिस्सा | प्राप्त राज्य हिस्सा | शिल्लक राज्य हिस्सा (५-६) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| २०१९-२० | ६५५.२६ | ६५५.२६ | -- | ४२६.८४ | ३९७.४६ | ३९.३८ |

वरील तक्त्यात दर्शविण्यात आलेला प्रलंबित राज्य हिस्सा रुपये ३९.३८ लक्ष (४०%) इतके अनुदान सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून राष्ट्रीय आयुष अभियानांतर्गत सामाजिक विशेष घटकाकरीता "२२१० जी५८३" या लेखाशिर्षाखाली वितरीत करण्यात येत आहे.

०२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहारण व संविवरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक

कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आयुष अभियान, राज्य आयुष सोसायटी यांच्याकडे सुपूर्द करावी. यासाठी सहसंचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०३. केंद्र शासनाच्या आयुष मंत्रालयाने घेतलेल्या निर्णयानुसार खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

(१) सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेला निधी राज्य शासनाच्या तिजोरीतून राज्य आयुष सोसायटीला वर्ग करण्यात आला आहे. तसेच पुनर्जिवित (Re-validation) करण्यात आलेला निधी केंद्र शासनाच्या मंजूर योजनांतर्गत उपयोगात आणाला जाणार आहे.

(२) वित्त मंत्रालय, केंद्र शासन नवी दिल्ली यांच्या कार्यालयीन ज्ञापन क्रमांक : १ (१३) PFMS/FCD/ २०२०, dated २३.०३.२०२१ अन्वये नव्याने दिलेल्या मार्गदर्शनानुसार निधी वितरणाबाबत अंमलबजावणी करण्यात येईल.

(३) राष्ट्रीय आयुष अभियान ही केंद्र पुरस्कृत अभियान राबवितांना केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार तंतोतंत पालन करण्यात यावे.

(४) केंद्र शासनाच्या आयुष मंत्रालयाने मंजूर केलेल्या आराखड्यानुसार (SAAP) मागील वर्षाचा निधी वितरीत करण्याबाबत (केंद्र व राज्य हिस्सा) लेखी हमीपत्र केंद्र शासनास सादर करण्यात येईल.

(५) सन २०१९-२० मधील निधी वितरीत केल्याशिवाय सन २०२१-२२ चा निधी प्राप्त करुन घेता येणार नाही.

(६) राष्ट्रीय आयुष अभियानांतर्गत सामाजिक विशेष घटकाकरीता राज्य हिस्सा (४०%) लेखाशिर्ष "२२१० जी५८३" खाली ३१ सहाय्यक अनुदानातून रुपये ३९.३८ लक्ष इतके अनुदान वितरीत करण्यात येईल.

(७) वितरीत करण्यात येणारे अनुदान सशर्त असून वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक : २०१३/ प्र.क्र. ८५/२०१३/अर्थसंकल्प-३, दिनांक : २५ एप्रिल, २०१३ अनुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

०४. सदर खर्च हा मागणी क्र.एन-३, २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६- सार्वजनिक आरोग्य, ७८९- अनुसूचित जाती उपयोजना (०१), अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना (०१)

(०४), राष्ट्रीय आयुष योजना (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम), ३१- सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशीर्षांतर्गत सन २०२१-२२ च्या उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

०५. सदर शासन निर्णय हा वित्त विभाग अनौ. संदर्भ क्रमांक : ४५१/व्यय-१४, दिनांक ३०.०३.२०२२ अन्वये आणि संदर्भ क्र.५ मधील सामाजिक न्याय व विशेष सहाय विभागाच्या, दिनांक ३१.०३.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र.२०२२०३३०२२०२१५६११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.04.04 12:10:16 +05'30'

**( वि. ल. लहाने )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
६. सहाय्यक संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
७. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग(अर्थसंकल्प/विघयो), मंत्रालय, मुंबई.
११. वित्त विभाग (व्यय-१४/ अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१२.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१३. निवडनस्ती (आरोग्य-७) .